**वनरक्षक संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या कार्यरत वनवृत्तातून दुसऱ्या अन्य वनवृत्तात बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एफएसटी ०३/१५/प्र.क्र.१५६/फ-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ:** - शासन महसूल व वनविभाग परिपत्रक क्र. एफएसटी-०६/१४/प्र.क्र. ३४४/फ-४ दि.०१.०९.२०१४.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन शासन परिपत्रकान्वये सुरवातीला सरळ सेवेने एखादया वनवृत्तामध्ये नेमणूक झालेल्या वन रक्षकांची इतरत्र बदली केल्यास त्या वनवृत्तातंर्गत नियतक्षेत्रातील कामकाज प्रभावित होऊ नये म्हणून अशा बदल्यांना प्रतिबंध करण्यात आला आहे. तथापि, गंभीर आजार आणि पती-पत्नी एकत्रिकरण इत्यादी कारणास्तव कार्यरत वनवृत्तातून अन्य वनवृत्तात कौटुंबिक आणि वैद्यकीय कारणास्तव विनंती बदल्यांचे प्रस्ताव शासनास प्राप्त होत आहेत. यासंदर्भात सहानुभूतिपूर्वक विचार करुन काही अपवादात्मक परिस्थितीत अशा बदल्या करण्याबाबतचे धोरण ठरवण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय:-**

वनरक्षक संवर्गामध्ये शासन सेवेत रुजू झाल्यानंतर किमान २ वर्ष सेवा पूर्ण केल्यानंतर कार्यरत असणाऱ्या वनवृत्तातून इतर वनवृत्तात खालील कारणास्तव बदली मिळण्याबाबत संबंधित कर्मचारी अर्ज करु शकेल.

**अ) शासकीय अधिकारी स्वत: किंवा यथास्थिती पती वा पत्नी वा त्याची मुले वा त्याच्यावर अवलंबून असलेले शासकीय अधिकाऱ्याची आई किंवा वडील यांचे पुढील आजार:-**

१. हृदयशस्त्रक्रियांची प्रकरणे.
२. मुत्रपिंड प्रतिरोपण शस्त्रक्रिया किंवा किडनी डायलेसीस.
३. कर्करोग.
४. ब्रेनट्युमर किंवा मेंदूवरील शस्त्रक्रिया.
५. निश्चेतनावस्था ( कोमा ).
६. मनोविकृतीने ग्रस्त.

वरील आजारांसंदर्भात जिल्हा शल्यचिकित्सक यांनी स्वत: प्रमाणित आणि स्वाक्षरी केलेले वैद्यकीय प्रमाणपत्र ग्राहय धरण्यात यावेत. तसेच जिल्हा शल्यचिकित्सक यांनी अशा आजारांसदर्भात प्रमाणपत्र देताना अत्यंत काळजीपूर्वक तपासणी करुनच प्रमाणपत्र स्वाक्षरीत केले जाईल याबाबत काळजी घ्यावी. कोणत्याही परिस्थितीत सोयीच्या ठिकाणी बदली मिळावी म्हणून सादर केलेली आजारा संदर्भात कागदपत्रे पूर्णत: खात्री केल्याशिवाय ग्राह्य धरु नयेत.

त्याचप्रमाणे संबंधित कुटूंबातील सदस्य पुर्णत: शासकीय कर्मचाऱ्यावर अवंलबून आहेत, हया पृष्टयर्थ कर्मचाऱ्यांच्या शिधापत्रिकेमध्ये त्या सदस्याचे नाव अंतर्भूत असणे आवश्यक आहे. शिधापत्रिका पुर्वीपासूनचीच असावी आणि केवळ इच्छित स्थळी बदली करुन घेण्यासाठी शिधापत्रिकेमध्ये एखादया सदस्याचे नाव जाणीवपूर्वक समाविष्ट केलेले नसावे याबाबत सखोल छाननी करुन खात्री करावी.

**ब) पती-पत्नी एकत्रीकरण** :-

वरील कारणासाठी केंद्र/राज्य शासकीय/निम शासकीय/जिल्हा परिषद/पंचायत समिती/महामंडळ/नगरपालिका/महानगर पालिका अथवा ज्या शासकीय शैक्षणिक संस्थेत ( शासकीय अनुदानित, खाजगी शिक्षण संस्था खेरीज ) पती किंवा पत्नी कार्यरत आहेत त्या कार्यालयाचे बोनाफाईड सर्टिफिकेट ग्राहय धरण्यात यावे. पती-पत्नी यांना आपापसातील सोयीचे वनवृत्त देताना शक्यतो नागपूर, अमरावती, औरंगाबाद, नाशिक या महसूल विभागातील जागा रिक्त राहणार नाहीत, याबाबत दक्षता घेण्यात यावी. त्याअनुषंगाने आपापसातील वनवृत्त बदल्यांचे प्रस्ताव विचारात घ्यावे.

एका वनवृत्तातून दुसऱ्या वनवृत्तात बदली झाल्यानंतर संबंधित वनरक्षकास बदली केलेल्या वनवृत्तात शुन्य जेष्ठतेवर ( zero seniority ) नेमणूक देण्यात येईल. अशा शुन्य जेष्ठतेसंदर्भात आणि भविष्यातील पदोन्नतीबाबत कोणताही दावा किंवा तक्रार किंवा न्यायालयीन प्रकरण उपस्थित केले जाणार नाही, अशा स्वरुपाचे प्रतिज्ञापत्र अर्जासोबत घ्यावे. या संदर्भातील प्रतिज्ञापत्र जे कोणत्याही न्यायालयात, न्यायालयीन प्रकरणात ग्राहय धरले जाईल अशा स्वरुपात घेण्यात यावे. सदर प्रतिज्ञापत्राचा नमुना कायदेशीर सल्लागार यांच्याकडून तयार करुन घेण्याबाबतची कार्यवाही प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून करण्यात यावी. सदर नमुन्यामध्येच प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे. तसेच या संदर्भातील अर्जाचा नमुना आणि त्या सोबत जोडावयाची आवश्यक असणारी कागदपत्रे, प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), यांनी तयार करावा. सदर नमुन्यात कर्मचाऱ्यांचे अर्ज स्विकारावेत.

उपरोक्त नमुद **अ** आणि **ब** येथील कारणांसाठी संबंधित कर्मचाऱ्याने सध्याच्या ठिकाणी किमान दोन वर्ष सेवा झाल्यानंतर योग्य त्या समर्थनांसह व कागदपत्रांसह प्रधान मुख्य वनसरंक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना विहीत नमुन्यात व प्रतिज्ञापत्रासह अर्ज करणे आवश्यक राहील. या संदर्भातील कागदपत्रांची वर नमुद केल्याप्रमाणे तपासणी केल्यानंतर बदली प्रस्ताव विचारात घेवून पुढील योग्य ती कार्यवाही करण्याबाबत प्रधान मुख्य वनसंरक्षक ( वनबल प्रमुख ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७११०६१२५०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.08.07 11:14:01 +05'30'

**(डी. एल. थोरात)**
**सह सचिव (वने)**

**प्रतिलिपी :-**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा. मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
३. अपर प्रधान मुख्य सचिव ( वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्य विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव ( सार्वजनिक आरोग्य विभाग ), मंत्रालय, मुंबई.
५. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७. व्यवस्थापकीय संचालक, वन विकास महामंडळ मर्या॰ कडबी चौक, नागपूर
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०.सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
११.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
१२.सर्व मुख्य वनसंरक्षक/वनसंरक्षक/उपवनसंरक्षक
१३.महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१४.सर्व विभागीय आयुक्त
१५.जिल्हाधिकारी (सर्व)
१६.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद (सर्व)
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१९.सर्व जिल्हा शल्यचिकित्सक, सार्वजनिक आरोग्य विभाग
२०.सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग (वनकक्ष)
२१.निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.